**मुंबई मेट्रो टप्पा-३ (कुलाबा-बांद्रा-सिप्झ) करीता फ्री प्रेस जर्नल मार्गावरील शासकीय कार्यालये तात्पुरत्या स्वरुपात स्थलांतरीत करुन त्यांना जागा वाटप करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शाकाजा-१११५/प्र.क्र.१०९/२०१५/२२**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
तारीख: ९ नोव्हेंबर,२०१६

**वाचा :** शासन निर्णय क्रमांकः शाकाजा-१११५/प्र.क्र.१०९/२०१५/२२, दि.२१-१०-२०१५

**प्रस्तावना :**

मुंबई मेट्रो टप्पा-३ (कुलाबा-बांद्रे-सिप्झ) संपूर्णत: भूयारी मार्ग प्रकल्पाची कार्यवाही सुरु करण्यात येणार आहे. मुंबई मेट्रो टप्पा-३ (कुलाबा-बांद्रे-सिप्झ) साठी तयार केलेल्या प्रकल्प आराखड्यामध्ये फ्री प्रेस जर्नल मार्गावरील कुटीरांमध्ये (बॅरेक्समध्ये) कार्यरत असणाऱ्या राजकीय पक्ष व शासकीय कार्यालयांची जागा मेट्रो रेल्वे करीता तात्पुरत्या स्वरूपात हस्तांतरित करण्यासाठी तसेच शासकीय कार्यालय व राजकीय पक्षांची कार्यालये पर्यायी ठिकाणी तात्पुरत्या स्वरुपात शासन निर्णय क्र.शाकाजा-१११५/प्र.क्र.१०९/२०१५/२२ दि. २१ ऑक्टोबर, २०१५ अन्वये स्थलांतरित करण्यात आली. तत्पूर्वी अधिदान व लेखा कार्यालय ही फ्री प्रेस जर्नल मार्ग येथील कुटीर क्र.६,९,१०,११,१२,१३ येथे ११,९५० चौ.फू. जागेत प्रत्यक्षात कार्यरत होती. तथापि, शासन निर्णय दिनांक २१.१०.२०१५ अन्वये जागा वाटप करताना या कार्यालयाच्या उपरोक्त नमूद केलेल्या शासकीय कुटीरांपैकी कुटीर क्र. ६ व १० मधील ४२५० चौ. फूट जागा ही संचालक, लेखा व कोषागारे या कार्यालयास वाटप करण्यात आली आहे. अशाप्रकारे अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई या कार्यालयाला (११९५०-७७०० = ४२५०) ४२५० चौ.फूट इतक्या कमी जागेचे वाटप करण्यात आले आहे. तरी ठाकरसी इमारतीतील संचालनालय, लेखा व कोषागारे कार्यालयास अतिरिक्त वाटप करण्यात आलेली ४२५० चौ.फू. जागा काढून घेवून अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई या कार्यालयाकरीता अनुज्ञेय असलेली ११९५० चौ.फूट जागा एकाच इमारतीमध्ये सलग वाटप करणे तसेच ठाकरसी इमारतीतील उपलब्ध असलेली ४५९५ चौ.फू. जागेमध्ये जी.ओ.एल.ग्रुप, यु.बी.आय.बिल्डींग, चर्चगेट, मुंबई येथील इमारतीतील रंगभूमि प्रयोग व परिनिरीक्षण मंडळ कार्यालय, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र शासन (प्रकाशने विभाग) यांचे कार्यालय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग आणि अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांची कार्यालये स्थलांतरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता, त्यानुषंगाने आता शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे:-

**शासन निर्णय:**

ठाकरसी इमारतीतील संचालनालय, लेखा व कोषागारे कार्यालयाच्या नावे अतिरिक्त दर्शविण्यात आलेली ४२५० चौ.फू. जागा काढून घेवून अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई या कार्यालयाकरीता ११९५० चौ.फूट जागा एकाच इमारतीमध्ये सलग वाटप करण्यात यावी. तसेच मुंबई पोर्ट ट्रस्ट, पोर्ट हाऊस, शुरजी

वल्लभदास मार्ग, ठाकरसी हाऊस, बेलार्ड इस्टेट, मुंबई-०१ या इमारतीतील उपलब्ध असलेल्या ४५९५ चौ.फू. जागेमध्ये जी.ओ.एल.ग्रुप, यु.बी.आय.बिल्डींग, चर्चगेट, मुंबई येथील इमारतीतील रंगभूमि प्रयोग व परिनिरीक्षण मंडळ कार्यालय, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र शासन (प्रकाशने विभाग) यांचे कार्यालय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग आणि अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई ही कार्यालये स्थलांतरीत करुन खालीलप्रमाणे तात्पुरत्या स्वरुपात जागा वाटप करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे:-

| अ. क्र. | कुटीर क्रमांक | कुटीरातील जागेचा वापर करणाऱ्या कार्यालयाचे नांव | नव्याने वाटप करावयाचे जागेचे ठिकाण | नव्याने वाटप करावयाचे क्षेत्रफळ (चौ.फू.) |
|---|---|---|---|---|
| १ | ६ | अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई, | मुंबई पोर्ट ट्रस्ट, पोर्ट हाऊस, शुरजी वल्लभदास मार्ग, बेलार्ड इस्टेट, मुंबई-०१ ठाकरसी हाऊस, २ रा व ३ रा मजला | १३०० |
| २ | १८ | रंगभूमि प्रयोग व परिनिरीक्षण मंडळ कार्यालय | | ८२० |
| ३ | १९ | माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र शासन (प्रकाशने विभाग) यांचे कार्यालय | | २०७५ |
| ४ | ८ | पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग | | ४०० |
| | | | **एकूण:-** | **४५९५** |
| ५ | ६ | अधिदान व लेखा अधिकारी यांचे कार्यालय | जी.ओ.एल.ग्रुप, यु.बी.आय.बिल्डींग, चर्चगेट, मुंबई | १२५० |
| ६ | ०९ | अधिदान व लेखा अधिकारी यांचे कार्यालय | | ३००० |
| ७ | १० | अधिदान व लेखा अधिकारी यांचे कार्यालय | | ३००० |
| ८ | ११ | अधिदान व लेखा अधिकारी यांचे कार्यालय | | ५०० |
| ९ | १२ | अधिदान व लेखा अधिकारी यांचे कार्यालय | | ३००० |
| १० | १३ | अधिदान व लेखा अधिकारी यांचे कार्यालय | | १२०० |
| | | | **एकूण:-** | **११९५०** |
| ११ | १४ | संचालक, लेखा व कोषागारे | मुख्य अभियंता, मुंबई पोर्ट ट्रस्ट, पोर्ट हाऊस, शुरजी वल्लभदास मार्ग, बेलार्ड इस्टेट, मुंबई-०१ ठाकरसी हाऊस, २ रा व ३ रा मजला | १२०० |
| १२ | १५ | संचालक व लेखा कोषागारे महाराष्ट्र राज्य | | ३००० |
| १३ | १६ | संचालक व लेखा कोषागारे महाराष्ट्र राज्य | | ३००० |
| | | | **एकूण:-** | **७२००** |

नवीन स्थलांतरीत ठिकाणी कार्यालयाची रचना कशी असावी याबाबत संबंधित विभाग/कार्यालयांने आराखडा तयार करुन सदरचा आराखडा मुं.म.प्र.वि.प्राधिकरण आणि मुंबई मेट्रो रेल्वे महामंडळ (एमएमआरसी) यांना उपलब्ध करुन द्यावा.

संबंधित शासकीय कार्यालयांनी उपलब्ध करुन दिलेल्या आराखड्यानुसार संबंधित कार्यालयांना तक्त्यामध्ये दर्शविल्याप्रमाणे जागेची आखणी, बसण्याची व्यवस्था तसेच कार्यालय हलविणे/स्थलांतरणासाठी मुं.म.प्र.वि.प्राधिकरण आणि एम.एम.आर.सी. यांनी आवश्यकती कार्यवाही करावी. तसेच मुंबई मेट्रो टप्पा-३ (कुलाबा-बांद्रे-सिप्झ) चे कामकाज पुर्ण झाल्यानंतर फ्री प्रेस जर्नल

मार्गावरील कुटीरांच्या (बॅरेक्सच्या) मूळ जागेत नव्याने कार्यालयीन इमारतीचे बांधकाम करुन या कार्यालयीन इमारतीमध्ये स्थलांतरीत करण्यात आलेल्या शासकीय कार्यालय व राजकीय पक्षांच्या कार्यालांना पुन्हा तक्त्यामध्ये दर्शविल्याप्रमाणे जागेची आखणी, बसण्याची व्यवस्था तसेच कार्यालय हलविणे/स्थलांतरणासाठी मुं.म.प्र.वि.प्राधिकरण आणि एम.एम.आर.सी. यांनी आवश्यक ती कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६११०९१४४४१९०१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pramod Harishchandra Bhagat

Digitally signed by Pramod Harishchandra Bhagat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400031, st=Maharashtra, cn=Pramod Harishchandra Bhagat
Date: 2016.11.09 14:47:04 +05'30'

**( प्र. ह. भगत )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सर्व सन्माननीय विधानसभा/परिषद व संसद सदस्य
२. विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधान मंडळ, मुंबई
३. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५. सर्व मा.अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
६. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२.
७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई-३२.
८. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. व्यवस्थापकीय संचालक, मुंबई मेट्रो रेल्वे महामंडळ, बांद्रा कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा (पू.), मुंबई-५१.
१०. अपर जिल्हाधिकारी, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, बांद्रा कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा (पू.), मुंबई-५१.
११. तहसिलदार (मेट्रो-३), मुंबई मेट्रो रेल्वे महामंडळ, बांद्रा कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा (पू.), मुंबई-५१.
१२. उप सचिव (का.२२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३. सरकारी अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई, फ्री प्रेस जर्नल मार्ग, कुटीर क्र.६, मुंबई.
१४. संचालक, अधिदान व लेखा कार्यालय, फ्री प्रेस जर्नल मार्ग, कुटीर क्र.६, ९, ११, १२ व २०, मुंबई.
१५. संचालक, लेखा व कोषागारे कार्यालय, फ्री प्रेस जर्नल मार्ग, कुटीर क्र.१०, १३ व १५ व १६, मुंबई.

१६. रंगभूमी प्रयोग व परिनिरीक्षण मंडळ, फ्री प्रेस जर्नल मार्ग, कुटीर क्र.१८, मुंबई.

१७. माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र शासन (प्रकाशने विभाग), फ्री प्रेस जर्नल मार्ग, कुटीर क्र.१९, मुंबई.

१८. कार्यकारी अभियंता, इलाखा शहर (सा.बां.) विभाग, बांधकाम भवन, २ रा मजला, मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई-०१.

१९. उप अभियंता, दक्षिण उपविभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग. एम.टी.डी. सी. समोर, मुंबई-३२.

२०. शाखा अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय आवार, मुंबई-३२.

२१. शाखा अभियंता (सा.बां.) बंगलो, नवीन प्रशासन भवन, तळमजला, मुंबई-३२.

२२. मुख्य दुरध्वनी चालिका मंत्रालय, मुख्य इमारत तळमजला, मुंबई-३२.

२३. निवडनस्ती.